**पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांचे आस्थापनेवरील मंत्रालयीन अधिकारी व कर्मचाऱ्यांची पदे पोलीसआयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरुन भरण्याऐवजी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेकडून भरण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-०५२५/प्र.क्र.१८९/विशा-४**

मंत्रालय मुख्य इमारत, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

तारीख: १५ मे, २०२५.

वाचा:-

१) शासन निर्णय क्र.एसएसए-१०/०३/१५/विशा-४, दिनांक ०८.०७.२००४

२) शासन निर्णय क्र.एसएसए-१००६/प्र.क्र.३६३/विशा-४, दिनांक २३.०४.२००७

३) शासन निर्णय क्र.एसएसए-१००९/प्र.क्र.६०/विशा-४,दिनांक २७.०७.२००९

४) शासन निर्णय क्र.एसएसए-१००९/प्र.क्र.४२५/विशा-४, दिनांक १४.०६.२०१०

५) शासन निर्णय क्र.एसएसए-२०१०/प्र.क्र.९४८/विशा-४, दिनांक ३१.०१.२०१२

६) क्र.पोआ/कक्ष ४ (ना.आ.)/संकीर्ण/१५८८/२०२३, दि.११.०८.२०२३

प्रस्तावना :

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी त्यांचे आदेश क्र.पोआ/कक्ष-२ (७)/रवका/१४/१०, दि.३०/०८/२०१० अन्वये त्यांचे आस्थापनेवरील २२१ पदे कमी करुन सदर पदे पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर वर्ग केली असून त्यामध्ये मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी यांच्या एकूण २० पदांचा ही समावेश आहे.

सद्यःस्थितीत पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवर खालीलप्रमाणे मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी कार्यरत आहेत.

| **अ.क्र** | **पदनाम** | **संख्या** |
|---|---|---|
| १. | प्रशासकीय अधिकारी | १ |
| २. | कार्यालयीन अधीक्षक | १ |
| ३. | वरिष्ठ श्रेणी लिपीक | ५ |
| ४. | कनिष्ठ श्रेणी लिपीक | २ |
| | **एकूण** | **९** |

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या संदर्भ क्र.६ अन्वये सद्यःस्थितीत त्याचे कार्यालयाकडून दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यलयात कार्यरत असलेले मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी परत करणेबाबत तसेच पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांचे आस्थापनेवर मंजूर असलेली मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी यांची सर्व पदे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या ऐवजी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेकडून भरण्याबाबत संदर्भाद्वारे विनंती केली आहे.

दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाचे कामकाज कार्यक्षम करणेकामी व कामामध्ये सुसूत्रता येण्याकरिता व कामकाज सुरळीत चालण्याकरिता मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी यांची अत्यंत आवश्यकता आहे

यास्तव, पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांचे आस्थापनेवरील मंत्रालयीन अधिकारी व कर्मचाऱ्यांची पदे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरुन भरण्याऐवजी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेकडून भरणेबाबत मान्यता देण्याची तसेच पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयातील मंजूर असलेले प्रशासकीय अधिकाऱ्याचे पद व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील वरिष्ठ कार्यालय अधीक्षक या दोन्ही पदांचा वेतनस्तर (एस-१५, ४१८००-१३२३००) एकसमान असल्याने, सदरचे पद पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या शहर लिपिक आस्थापनेकडून भरण्याकरिता सदर प्रशासकीय अधिकारी या पदाचे पदनाम बदलून त्याऐवजी वरिष्ठ कार्यालय अधीक्षक असे करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:</u>

पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयातील मंजूर असलेले प्रशासकीय अधिकाऱ्याचे पद व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील वरिष्ठ कार्यालय अधीक्षक या दोन्ही पदांचा वेतनस्तर (एस-१५, ४१८००-१३२३००) एकसमान असल्याने, सदरचे पद पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या शहर लिपिक आस्थापनेकडून भरण्याकरिता सदर प्रशासकीय अधिकारी या पदाचे पदनाम बदलून त्याऐवजी वरिष्ठ कार्यालय अधीक्षक असे करण्याबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे.

तसेच पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवरील आकृतीबंधानुसार मंजूर असलेली खालील मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी यांची एकूण २० पदे पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेकडून भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र** | **पदनाम** | **संख्या** |
|---|---|---|
| १. | प्रशासकीय अधिकारी | १ |
| २. | कार्यालयीन अधीक्षक | १ |
| ३. | उच्च श्रेणी लघुलेखक | २ |
| ४. | निम्न श्रेणी लघुलेखक | २ |
| ५. | प्रमुख लिपीक | १ |
| ६. | वरिष्ठ श्रेणी लिपीक | ५ |
| ७. | कनिष्ठ श्रेणी लिपीक | ८ |
| | **एकूण** | **२०** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१५१७०१०९१८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN SAHEBRAO DHIKALE

Digitally signed by PRAVIN SAHEBRAO DHIKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=6d1bb8a730bc70c2cbcd0b01bab78ae17bc671feb580bcbbcd692fb0650b8855, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5958E733FEF41BD5DDD91B20A6E0AC739E081BB933D0189686449BE15147182, cn=PRAVIN SAHEBRAO DHIKALE
Date: 2025.05.15 17:02:30 +05'30'

**( डॉ. प्रविण ढिकले )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई.
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), लेखापरीक्षा, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवडनस्ती (विशा-४).